**प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत प्रशासकीय खर्चासाठी रु. १८,७३,९२,९७७/- इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२३/प्र.क्र. ६२ /११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ जुलै, २०२३

वाचा :-

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.५२/११- अे, दि.२६.०६.२०२३
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२.०४.२०२३
३. आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सां.८ /वि.ह.अनु./मनुष्यबळ/१६४६४/२०२३, दि.१६.०५.२०२३
४. संचालक(वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सां.८/प्रपिवियो/प्रशा.खर्च/अनु.माग/१८६९८ /२०२३, दि.०५.०६.२०२३

प्रस्तावना :-

संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री पिक विमा योजना प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०२३ ते रब्बी २०२५-२६ पर्यंत राज्यात राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाचे मार्गदर्शक सूचनेतील मुद्दा क्र. १४. Budget for Administrative Expenses मधील मुद्दा क्र. १४.१ या तरतूदीनुसार योजनेंतर्गत प्रशासकीय व इतर अनुषंगिक खर्चासाठी एकुण मंजुर निधीपैकी ३ टक्के निधी अनुज्ञेय आहे. यानुषंगाने कृषि आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (३) च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरून योजनेच्या प्रशासकीय खर्चांतर्गत स्टेशनरी/प्रवास खर्च/ आकस्मिक खर्चाकरीता रु.७,८६,७०,०००/- आणि मनुष्यबळ मानधनासाठी रु.१०,८७,२२,९७७/- अशा प्रकारे एकूण रु.१८,७३,९२,९७७/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

प्रधानमंत्री पिक विमा योजनेअंतर्गत कृषि आयुक्तालयाने केलेली मागणी आणि केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १४.१ या बाबीचा विचार करता, योजनेच्या प्रशासकीय खर्चांतर्गत स्टेशनरी/प्रवास खर्च/ आकस्मिक खर्चाकरीता रु.७,८६,७०,०००/- आणि मनुष्यबळ मानधनासाठी रु.१०,८७,२२,९७७/- अशा प्रकारे एकूण रु.१८,७३,९२,९७७/- इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य**
**राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर, ३३- अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनां व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयानुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. योजनेंतर्गत प्रशासकीय खर्चाकरिता (स्टेशनरी/प्रवास खर्च/आकस्मिक खर्चासाठी आणि मनुष्यबळ मानधनासाठी) वितरीत निधी हा वित्त विभाग व इतर प्रशासकीय विभाग यांनी दिलेल्या निर्देशानुसार खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

६. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१९१/२०२३/व्यय१, दि.११.०७.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०७२८१८२८००४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.07.28 18:28:48 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१०.सह/उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
११.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१२.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).